**मुख्यमंत्री कृषि व अन्न प्रक्रिया योजना सन २०१८-१९ मध्ये राबविण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मस्त्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. राअअ-२०१८/प्र.क्र.१७९/९-अे**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २० जून, २०१८.

वाचा-
१.शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र.राअअ-१११६/प्रक्र२४८/१४अे, दि.२० जून २०१७
२.शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र.कृप्रधो-२०१७/प्रक्र२०८/९अे, दि.३१ ऑक्टोबर २०१७
३.शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र.कृराधो-१४१७/प्रक्र१०९/९अे, दि.०६ जून २०१८

**प्रस्तावना :-**

राज्यातील अन्नप्रक्रिया उद्योगाला चालना देणे, शेतीमालाचे मूल्यवर्धन करणे करिता शेतकऱ्यांचे सहभागाद्वारे आधुनिक तंत्रज्ञानावर आधारित प्रकल्प स्थापित करण्यास प्रोत्साहन देणे, उत्पादित अन्न पदार्थाच्या गुणवत्तेमध्ये वाढ व्हावी, उर्जेची बचत व्हावी यासाठीच्या प्रकल्पाच्या आधुनिकीकरणास प्रोत्साहन देणे या उद्दिष्टांसह राज्यामध्ये सन २०१७-१८ या आर्थिक वर्षापासून **मुख्यमंत्री कृषि व अन्न प्रक्रिया योजना** ही नवीन १००% राज्य पुरस्कृत योजना पुढील पाच वर्षाकरिता राबविण्यास दि.३०.०५.२०१७ रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार सदर योजनेच्या मंजूरीबाबत संदर्भाकित दि.२०/०६/२०१७ रोजी शासन निर्णय निर्गमित केला आहे. त्याचप्रमाणे, संदर्भाकित दि.३१ ऑक्टोबर, २०१७ च्या शासन निर्णयान्वये राज्याचे अन्न प्रक्रिया धोरण २०१७ जाहीर करण्यात आलेले आहे.

त्यानुषंगाने, मुख्यमंत्री कृषि व अन्न प्रक्रिया योजना सन २०१८-१९ मध्ये राबविण्याकरिता रू.५००० लक्ष (रू. पन्नास कोटी फक्त) ची तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली असून सदर योजनेस चालू वर्षाकरिता प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्याबाबत शासन आता पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

१. मुख्यमंत्री कृषि व अन्न प्रक्रिया योजना सन २०१८-१९ मध्ये राबविण्याकरिता प्रशासकीय मान्यता देण्यात येत असून या योजनेकरिता चालु वर्षी एकूण रू.५००० लक्ष (रू. पन्नास कोटी फक्त) अर्थसंकल्पिय तरतूद मंजूर करण्यात येत आहे.

२. संदर्भांकित शासन निर्णय दि.२०/०६/२०१७ अन्वये विहित केलेल्या तरतुदींनुसार सदर योजनेची अंमलबजावणी करण्यात यावी व त्यानुषंगाने योजना सन २०१८-१९ मध्ये राबविण्याकरिता मार्गदर्शक सूचना कृषि आयुक्तालय स्तरावरून निर्गमित कराव्यात.

३. सदर योजनेंतर्गत इच्छुक संस्थांनी अर्ज सादर करण्याकरिता वृत्तपत्राद्वारे जाहिरात देऊन संबंधितांना अर्ज करण्याबाबत सूचित करावे.

४. सदर योजना सन २०१८-१९ मध्ये राबविण्याकरिता आयुक्त कृषि, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी तर सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर अभियानाकरिता सन २०१८-१९ अंतर्गत रु. ५००० लक्ष अर्थसंकल्पिय तरतूद मंजूर असून ती कृषि आयुक्तालयाच्या मागणीनुसार वरचेवर खालील लेखाशिर्षा अंतर्गत वितरीत करण्यात येईल.

**मागणी क्र. डी-३,**
**२४०१-पीक संवर्धन,**
**(००) (१०२) अन्नधान्य पीके,**
**(००) (३४) मुख्यमंत्री कृषी व अन्न प्रक्रिया योजना (१००% राज्य योजना)**
**(२४०१ A ७९१)**
**३३, अर्थसहाय्य** **रू.५०००.०० लक्ष**

६. सदर योजनेकरिता चालु वर्षी मंजूर केलेल्या अर्थसंकल्पिय तरतूदीच्या १०० टक्के कार्यक्रमाची अंमलबजावणी चालु वर्षी करण्यात यावी व त्यानुसार पात्र संस्थांची निवड करावी.

७. राज्य शासनाने विहीत केलेले नियम/सुचनांचे पालन करून लेखापरिक्षण करून निधी वितरणाचे उपयोगिता प्रमाणपत्र राज्य शासनास सादर करावे..

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८०६२११२१७४२७३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षंकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2018.06.21 12:16:55 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव.

२. मा. मंत्री (कृषि व फलोत्पादन) यांचे स्वीय सहायक.
३. मा. राज्यमंत्री (कृषि व फलोत्पादन) यांचे स्वीय सहायक.
४. मा.विरोधीपक्षनेते, विधानसभा, विधानमंडळ, मुंबई.
५. मा.विरोधीपक्षनेते, विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई.
६. मा. विधान परिषद/विधानसभा सदस्य, विधानमंडळ सचिवाल, मुंबई.
७. मा.मुख्य सचिव यांचे स्विय सहाय्यक.
८. अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२,
९. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे.
१०. संचालक (प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११. सहाय्यक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, पुणे.
१२. उप सचिव (फलोत्पादन) यांचे स्विय सहाय्यक.
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षण) मुंबई/नागपूर महाराष्ट्र
१४. कक्ष अधिकारी (का.१४३१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
१५. कक्ष अधिकारी (अर्थ.-१३/ व्यय-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
१६. कक्ष अधिकारी (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
२६. निवड नस्ती-९अे.